निवडसूची सन २०१६-१७.
शस्त्र निरीक्षण शाखेतील "पोलीस उप अधीक्षक (आयुधिक)" या संवर्गातील पदावर पदोन्नतीने पदस्थापना....

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन आदेश क्र.रापोसे-२२१७/प्र.क्र.२१३/पोल-१(अ)
### मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
### दिनांक :- १३ ऑगस्ट, २०१८.

वाचा :-पोलीस महासंचालक यांचे पत्र क्र. पोमसं/२/१०(५)/पदो-सागर/२३३/२०१६, दि.१४.११.२०१७ व दि.१२.६.२०१८.

शासन आदेश :-

शस्त्र निरीक्षण शाखेतील "पोलीस उप अधीक्षक (आयुधिक)" या पदावर पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०१६-१७ च्या निवडसूचीमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या शस्त्र निरीक्षण शाखेतील "पोलीस निरीक्षक (आयुधिक)" या संवर्गातील खालील अधिकाऱ्यास " पोलीस उप अधीक्षक (आयुधिक), शस्त्र निरीक्षण शाखा" या (वेतनश्रेणी रु. १५,६००-३९,१००+ग्रेड पे ५४००/-) पदावर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याच्या नियुक्तीचे ठिकाण | नवीन नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. दत्तात्रय दादू सागर | पोलीस निरीक्षक (आयुधिक), शस्त्र निरीक्षण शाखा, पुणे | पोलीस उप अधीक्षक (आयुधिक), शस्त्र निरीक्षण शाखा, पुणे |

२. उपरोक्त अधिकाऱ्यास विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीनंतर जर त्यांच्याविरुध्दच्या प्रलंबित/ प्रस्तावित विभागीय / संक्षिप्त / प्राथमिक चौकशी / न्यायालयीन कार्यवाहीच्या अनुषंगाने शिक्षा झाल्यास, सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १५ डिसेंबर, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार, पदोन्नती संदर्भात पुढील कार्यवाही करावी.

३. उपरोक्त पदोन्नती, मा. सर्वोच्च न्यायालय येथे दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ वर मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या, तसेच, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

४. सदर तदर्थ पदोन्नती निव्वळ तात्पुरती स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी उपरोक्त अधिकाऱ्यांस नियमितपणा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

**५.** पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या पदांवर मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण अथवा अन्य मा. न्यायालयाचे आदेश असल्यास तसेच निवडणूक आचारसंहिता असल्यास, ते विचारात घेऊन उक्त अधिकाऱ्यांस पदस्थापना देण्यात यावी.

**६.** उक्त पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांस, सध्याच्या पदावरून कार्यमुक्त करून, त्यांना पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यासाठी महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक ती कार्यवाही त्वरित करावी.

**७.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८०८१३११३९३०५१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2018.08.13 11:44:29 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**उप सचिव, गृह विभाग**

**प्रति,**

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री (गृह) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. राज्यमंत्री (गृह) (शहरे/ग्रामिण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. अपर मुख्य सचिव (अपील व सुरक्षा) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. पोलीस आयुक्त, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०. संबंधित अधिकारी (पोलीस महासंचालक यांचेमार्फत),
११. निवडनस्ती / पोल-१(अ).